**राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ नागपूर येथील प्रशासकीय इमारत क्र.१, नागपूर येथे नुतनीकरण व दुरुस्तीसाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**




**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

शासन निर्णय क्र. ग्रासंअ- ०७२४/प्र.क्र.६४/ग्रा.सं.४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक :-२४ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.१७.०४.२०१५

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९

३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.९.२०१९

४) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे दि.१०.०१.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांनी दि.१०.०१.२०२५ च्या पत्रान्वये, प्रशासकीय इमारत क्र.१, नागपूर येथे कार्यरत राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ नागपूर या कार्यालयाच्या नुतनीकरण, दुरुस्ती व फर्निचरचा पुरवठा करणे या कामासाठी मुख्य अभियंता यांनी तांत्रिक मान्यता दिलेल्या रू.१,११,२१,८४९/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेच्या अनुषंगाने शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ नागपूर या कार्यालयाच्या नुतनीकरण, दुरुस्ती व फर्निचरचा पुरवठा करणे या कामांच्या अनुषंगाने येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ नागपूर येथील प्रशासकीय इमारत क्र.१, नागपूर येथे नुतनीकरण, दुरुस्ती व फर्निचरचा पुरवठा करण्यासाठी येणाऱ्या रु.१,११,२१,८४९/- (एक कोटी अकरा लाख एकवीस हजार आठशे एकोणपन्नास रुपये फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास (अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कामाच्या विगतवारीनुसार) खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अटी व शर्ती:-

१. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित निधीतून वित्त विभागाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर सदर निधी वितरीत करण्यात येईल.

२. अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कामाच्या विगतवारीनुसार काम पूर्ण करावे. अंदाजपत्रकात समाविष्ट नसलेल्या कोणत्याही बाबींच्या अनुषंगाने निधी खर्च करु नये.

३. कामाचे कार्यान्वयन करण्यापुर्वी सविस्तर अंदाजपत्रक तयार करुनच काम हाती घ्यावे.

४. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ नागपूर कार्यालयाची जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा प्रसिध्द करण्यात याव्यात.

५. काम सुरु करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था /प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६. सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंता यांनी तोंडी दिलेल्या सुचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे करु नयेत.

७. कामकाजासाठी विलंब अथवा इतर कारणांनी वाढीव खर्च होणार नाही, याबाबत संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी दक्षता घ्यावी.

८. प्रस्तावांतर्गत अंदाजपत्रकीय कामांमध्ये नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत शासनाचे लेखी आदेश प्राप्त करुनच विहित मुदतीत व पद्धतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करून शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करण्यात येईल.

९. अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कामाच्या विगतवारीनुसार निधी उपलब्ध झाल्यानंतर कामकाजास तातडीने सुरुवात करावी व निधी खर्च झाल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) सादर करावे.

१०. अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कामाच्या विगतवारीनुसार काम पूर्ण झाल्यानंतर सदर काम गुणवत्तापूर्ण व उत्कृष्ट दर्जाचे झाल्याचे झाले असल्याबाबत अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, खंडपीठ नागपूर व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी संयुक्तपणे प्रत्यक्ष भेट देऊन पहाणी करावी. त्यानुसार प्रमाणित केलेला अहवाल शासनास सादर करावा.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च, मागणी क्रमांक-एम ५, मुख्य लेखाशिर्ष, ५४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च १०२, नागरी पुरवठा, (००)(०१) ग्राहक मंचासाठी इमारतीचे बांधकाम करणे (५४७५ ०२३९) ५३, मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी सन २०२४-२५ वर्षासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे परिपत्रक दि.२५.९.२०१९ अन्वये व वित्त विभाग शासन निर्णय दि.१७.०४.२०१५ व दि.२०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-५ अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.१३४(१) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदरचा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०२२४१२३१५५१४०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA DAGADU FATE

Digitally signed by PRADNYA DAGADU FATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=a848319143424ef222d686b2c55b1a6e0d81ab1491664293c31d122b6ed5db02, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=36E36169CC745B209AD8A11BCA00BFC33087D53E6BD16ACAC9DB647D10CB4F63, cn=PRADNYA DAGADU FATE
Date: 2025.02.24 12:33:06 +05'30'

**(प्रज्ञा दगडू फटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (अ.ना. पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
३. मा. सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
४. मा.सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक.
५. मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
६. उप सचिव, ग्रा.सं.४ (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
८. प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
९. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, परिक्रमा खंडपीठ, नागपूर.
१०. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
११. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर.
१३. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, नागपूर.
१४. प्रबंधक, अतिरिक्त जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, नागपूर.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई /नागपूर.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नवी मुंबई.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१९. निवडनस्ती, ग्रा.सं.४